केंद्र पुरस्कृत "National Cybercrime Helpline number १९३०" या योजनेकरिता निधी वितरीत करण्यास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०२३/प्र.क्र.७४/विशा-३अ**
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय,मुंबई-४०००३२
तारीख: २१ ऑगस्ट ,२०२३

**संदर्भ :-**

१) वित्त मंत्रालय,भारत सरकार,नवी दिल्ली यांचे कार्यालयीन ज्ञापन क्र.१(१३)/PFMS/२०२० दि.१६.०२.२०२३ .
२) गृह मंत्रालय ,भारत सरकार, नवी दि
३) ल्ली, यांचे कार्यालयीन ज्ञापन क्र.२१०११/४०/२०२३-PM-I दि.३१.३.२०२३
४) गृह मंत्रालय ,भारत सरकार, नवी दिल्ली, यांचे कार्यालयीन ज्ञापन क्र.२२००३/०२/२०२०-I4C दि.०२.०५.२०२३
५) वित्त विभाग, शासन पत्र क्र.संकीर्ण-२०२१/प्र.क्र.३५(भाग-१)कोषा प्रशा-४ दि. १६.०३.२०२३
६) शासन निर्णय सम क्रमांक दि.२६.०६.२०२३
७) शासन निर्णय सम क्रमांक दि.२५.०७.२०२३
८) वित्त विभाग,शासन परिपत्रक क्र.पूरक-२०२३/प्र.क्र.६२/अर्थ-३,दि.२८.०७.२०२३

**प्रस्तावना :-**

सायबर माध्यमांद्वारे होणारी आर्थिक फसवणूक रोखण्यासाठी आणि ग्राहकांची फसवणूक करणाऱ्यांचा शोध घेण्यासाठी "National Cybercrime Helpline number १९३०"केंद्र शासनामार्फत सुरू करण्यात आली आहे.त्याअनुषंगाने सदर हेल्पलाईन नंबर चा परिणामकारक अंमलबजावणी करण्यासाठी उपरोक्त संदर्भ क्र.१ अन्वये निधी उपलब्ध करून दिला आहे.

२. वित्त मंत्रालय, भारत सरकार यांच्या दिनांक १६.०२.२०२३ रोजीच्या कार्यालयीन ज्ञापनान्वये केंद्र पुरस्कृत योजनांच्या निधीचे परिणामकारक व्यवस्थापन करण्याच्या तसेच निधी विनियोगाच्या प्रक्रियेत अधिक परिणामकारकता आणण्याच्या दृष्टीने सुधारित कार्यपध्दतीचा अवलंब करण्याचे निर्देश दिलेले आहेत. त्याअनुषंगाने वित्त विभाग, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई यांनी दिनांक १६.०३.२०२३ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये केंद्र पुरस्कृत योजनांचे निधी वितरण व विनियोग व्यवस्थापन (PFMS) याबाबतच्या सुधारित सुचना निर्गमित केलेल्या आहेत.

३. वित्त मंत्रालय,भारत सरकार यांच्या सुधारित कार्यपध्दतीनुसार सदर योजन राबविण्याबाबत उपरोक्त संदर्भ क्र.५ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.तसेच उपरोक्त संदर्भ क्र.६ अन्वये सदर योजनेसाठी Single Nodal Agency (SNA) ची नेमणूक करण्यात आली आहे.आता सदर निधी

उपरोक्त संदर्भ क्र.३ अन्वये दिलेल्या निर्देशानुसार खर्च करण्यासाठी विहीत केलेल्या बाबीसाठी विशेष पोलीस महानिरीक्षक,सायबर,महाराष्ट्र राज्य,मुंबई यांना "National Cybercrime Helpline number १९३०" या योजनेसाठी वितरित करण्यास मान्यता देण्याबाबत प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

सायबर माध्यमांद्वारे होणारी आर्थिक फसवणूक रोखण्यासाठी आणि ग्राहकांची फसवणूक करणाऱ्यांचा शोध घेण्यासाठी केंद्र शासनाकडून "National Cybercrime Helpline number १९३०" या योजनेअंतर्गत प्राप्त रू.५४.४० लक्ष इतका निधी वितरीत करण्यास आणि खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. गृह मंत्रालय,भारत सरकार,नवी दिल्ली यांच्या उपरोक्त संदर्भ क्र.३ अन्वये खालील प्रमाणे सदर निधीचा विनियोग करण्यात यावा. त्याअंतर्गत (हार्डवेअर खरेदी करीता रु.३३.२० लक्ष) (सॉफटवेअर खरेदी करीता रु. ६.९५ लक्ष) व (प्रशिक्षण करीता रू.१४.२५) असा एकूण रु ५४,४०,०००/- इतका निधी खर्च करावयाचा आहे.त्याचा तपशील खालीलप्रमाणे

<table>
<tr><th colspan="5">Hardware</th></tr>
<tr><th>Sr. No</th><th>Item</th><th colspan="2">No. of unit to be procured</th><th>Approx. Cost (per unit)</th></tr>
<tr><td>1.</td><td>Computer for call agents</td><td colspan="2">15</td><td>80,000</td></tr>
<tr><td>2.</td><td>Computer for Analysts</td><td colspan="2">05</td><td>1,25,000</td></tr>
<tr><td>3.</td><td>Call Centre Server</td><td colspan="2">01</td><td>2,50,000,</td></tr>
<tr><td>4.</td><td>UPS 10 KVA</td><td colspan="2">01</td><td>90,000</td></tr>
<tr><td>5.</td><td>Laptop</td><td colspan="2">02</td><td>1,20,000</td></tr>
<tr><td>6.</td><td>Printer</td><td colspan="2">04</td><td>25,000</td></tr>
<tr><td>7.</td><td>Smart Mobile Phone</td><td colspan="2">15</td><td>15,000</td></tr>
<tr><td>8.</td><td>Headphone with Mic</td><td colspan="2">20</td><td>2,000</td></tr>
<tr><td>9.</td><td>Work Station</td><td colspan="2">15</td><td>30,000,</td></tr>
<tr><td>10.</td><td>Wall mount LED TV</td><td colspan="2">02</td><td>50,000</td></tr>
<tr><td colspan="4">Total</td><td>33,20,000</td></tr>
<tr><th colspan="5">Software</th></tr>
<tr><td>1.</td><td>Call Management (Cloud Telephony)</td><td colspan="2">01</td><td>6,00,000</td></tr>
<tr><td>2.</td><td>Data Capturing</td><td colspan="2">01</td><td>20,000</td></tr>
<tr><td>3.</td><td>Analysis of data</td><td colspan="2">01</td><td>50,000</td></tr>
<tr><td>4.</td><td>Agent calling Software</td><td colspan="2">01</td><td>25,000</td></tr>
<tr><td colspan="4">Total</td><td>6,95,000</td></tr>
<tr><th colspan="5">Training</th></tr>
<tr><th>Sr. No</th><th>Item</th><th>Approx calculation of man days</th><th>Approx no. of Man-days for Training</th><th>Approx Cost (per man day)</th></tr>
<tr><td>1.</td><td>Training for call Taker</td><td>15 x 2.5 x 10</td><td>375</td><td>3,000</td></tr>
<tr><td>2.</td><td>Training for Analyst</td><td>5 x 2 x 10</td><td>100</td><td>3,000</td></tr>
<tr><td colspan="4">Total</td><td>14,25,000</td></tr>
</table>

३. याबाबत गृह मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे सदर योजनेबाबत व निधी विनियोग बाबत वेळोवेळी निर्गमित होणाऱ्या मार्गदर्शक सूचनांचे तसेच, यंत्रसामग्री / साधनसामग्री खरेदी करण्याबाबत

उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनांचे काटेकोर पालन करण्याची दक्षता घ्यावी.

४. केंद्र शासनाच्या गृह विभागामार्फत वितरीत करण्यात आलेल्या निधीचा विनियोग / खर्च हा केंद्र / राज्य शासनाच्या प्रचलित नियमानुसार विहीत पध्दतीने येणा-या किमंतीनुसार व लेखाशिर्षनिहाय विहीत करण्यात आलेल्या एकूण वित्तीय मर्यादेच्या अधीन राहून व यासंदर्भातील वित्तीय औपचारीकता पूर्ण करून करण्यात यावा.

५. कोणत्याही परिस्थितीत प्राप्त निधी संचित (parking) स्वरूपात ठेऊ नये. यानुषंगाने प्राप्त निधीचा विनियोग झाल्यानंतर विहीत कालावधीत योग्य त्या विवरणपत्रात उपयोगिता प्रमाणपत्र (utilization certificate) सादर करावे. प्रस्तुत योजनेचे प्राधिकारी म्हणून केंद्रशासनाच्या आवश्यकतेनुसार अंतर्गत लेखापरीक्षणासाठी यासंदर्भातील लेखे अद्ययावत ठेवण्यात यावे.

६. सदर खर्च हा गृह विभाग, मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस,(००).११५-पोलीस दलाचे आधुनिकीकरण (०१) विविध तंत्रज्ञान विकास प्रकल्प (०१)(०४) राष्ट्रीय सायबर क्राइम हेल्पलाईन नंबर १९३०(३१) सहाय्यक अनुदाने (१०० केंद्र पुरस्कृत) (कार्यक्रम) २०५५ ए २०१ या लेखाशीर्षाखाली सन २०२३-२४ या चालू आर्थिक वर्षात उपलब्ध असलेल्या तरतूदीतून करण्यात यावा.

७. सदरहू शासन निर्णय वित्त विभाग,शासन परिपत्रक क्र.पूरक-२०२३/प्र.क्र.६२/अर्थ-३,दि.२८.०७.२०२३ अन्वये दिलेल्या निदेशांस अनुसरून व वित्त विभाग/व्यय-७ च्या दि.१०.०८.२०२३ च्या अनौ.सं.क्र.४३०/२०२३ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय हा महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०८२११७३७५१७६२९ असा आहे.शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAHUL VIJAY KULKARNI

Digitally signed by RAHUL VIJAY KULKARNI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=019d1a40755cacf50cb371c432c67afaec7da5aad928d966ad4270c6a4f1ac39, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=31493D4A6291F531ED8FD00972CCBFA0376623C7F6C38C3B848BFBE06685A219, cn=RAHUL VIJAY KULKARNI
Date: 2023.08.21 17:41:42 +05'30'

**( राहुल कुलकर्णी )**

**सह सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

२. मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.

३. अपर मुख्य सचिव (गृह), यांचे स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.

४. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

५. पोलीस आयुक्त, मुंबई.

६. प्रधान सचिव (विशेष), यांचे स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.

७. अपर पोलीस महासंचालक (नि व स). महाराष्ट्र राज्य, मुंबई.

८. मा. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
९. विशेष पोलीस महानिरीक्षक, म व वा अप्र. वि., महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
११. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
१२. व्यय-७, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. अर्थसंकल्प शाखा (बीयूडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. निवड नस्ती (विशा-३)